सीओईपी तंत्रज्ञान विद्यापीठ, पुणे या विद्यापीठास आर्थिक वर्ष २०२३-२४ करीता वेतन अनुदान वितरणास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-११११/(८९/१८)/तांशि-२**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक: १४ मार्च, २०२४.**

**संदर्भ: -**

१) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.४/आस्था/सीओईपी अनुदान/२०२३/६३५, दि.११ सप्टेंबर, २०२३.
२) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.४/आस्था/सीओईपी/२०२४/२२, दि.०८ जानेवारी, २०२४.
३) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.४/आस्था/सीओईपी अनुदान/२०२४/११४, दि.११ मार्च, २०२४.

**शासन निर्णय**:-

राज्य शासनाच्या दि.२१.०६.२०२२ रोजीच्या अधिसूचनेअन्वये महाराष्ट्र सीओईपी तंत्रज्ञान विद्यापीठ अधिनियम-२०२२ लागू झालेला आहे. या अधिनियमानुसार शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे (सीओईपी) हे सीओईपी तंत्रज्ञान विद्यापीठ, पुणे या नावाने एक असंलग्न एकात्मक विद्यापीठ म्हणून घटीत करण्यात आले आहे. उक्त अधिनियमातील कलम ७५(३) येथील तरतुदीनुसार सीओईपी तंत्रज्ञान विद्यापीठ, पुणे या विद्यापीठाच्या आस्थापनेवरील शासनमान्य पदावर कार्यरत अध्यापक व अध्यापकेतर अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतनाकरिता शासन अनुदान अनुज्ञेय आहे.

२. सीओईपी तंत्रज्ञान विद्यापीठास आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये वेतन अनुदानाकरीता रु.३५४३.२२ लक्ष इतकी रक्कम तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत वितरीत करण्यात आलेली आहे. सदर आदेशान्वये उर्वरित रु.१२०९.७६ लक्ष (अक्षरी रुपये बारा कोटी नऊ लक्ष शहाहत्तर हजार फक्त ) इतकी वेतन अनुदानाची रक्कम संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आहरित व वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. प्रस्तुत प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-३-२२०३, तंत्रशिक्षण,११२ अभियांत्रिकी/तंत्र महाविद्यालये संस्था (००), (००) (०१) शासकीय अभियांत्रिकी व वास्तुशास्त्र महाविद्यालये (वसतीगृहांसहीत) (अनिवार्य) ०१, वेतन-२२०३ ०३२७” या लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट याचिका क्र. ३५९२/२०१५, ३९१९/२०१५ व रिट याचिका (स्टॅम्प क्र.) ३४७८५/२०१५ व मध्ये दि.२८.०२.२०१९ रोजी मा.न्यायालयाने पारीत केलेल्या आदेशानुसार तसेच मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे प्रलंबित असलेल्या विशेष अनुमती याचिका क्र.१११३०/२०१९ व संलग्नित याचिकांमधील मा.न्यायालयाच्या निर्देशांच्या अधीन राहून संचालक, तंत्रशिक्षण यांनी उक्त निधी वितरीत करण्याबाबत कार्यवाही करावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१००/२०२४/व्यय-५, दि.२२ फेब्रुवारी, २०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०३१४१७०३३१८००८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2024.03.14 17:13:12 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) कुलगुरू, सीओईपी तंत्रज्ञान विद्यापीठ, पुणे.
२) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे.
४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई.
५) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
६) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी, बृहन्मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९) वित्त विभाग (कार्यासन व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अधिकारी, तांशि-३, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती/तांशि-२.